**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातील “सचिव” या संवर्गातील अधिकाऱ्यांची दि.१.१.२००१ ते दि.१.१.२०१० या कालावधीतील तात्पुरती सामायिक ज्येष्ठता सूची.**

**महाराष्ट्र शासन**
मराठी भाषा विभाग,
शासन परिपत्रक क्रमांकः साज्येसू-२०१४/प्र.क्र.८६/आस्था-२,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १८जानेवारी, २०१७,

**वाचा :सामान्य प्रशासन विभाग , शासन निर्णय क्रमांक- एसआरव्ही,१२/२८४.क्र.प्र/२०११- दि.२१.१०.२०११.**

**शासन परिपत्रक**

मराठी भाषा विभागाच्या निर्मितीनंतर या विभागाच्या अधिनस्त महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ कार्यालयातील - “सचिव” या गट-अ राजपत्रित अधिकाऱ्यांची सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही-२०११/प्र.क्र.२८४/१२, दि.२१.१०.२०११ मधील तरतुदीनुसार दि.१.१.२००१ ते दि.१.१.२०१० या कालावधीची तात्पुरती ज्येष्ठतासूची प्रसिध्द करावयाची आहे. -”सचिव” हे पद सन २००१ ते सन २००७ या कालावधीत रिक्त होते (सदर पदाचे कामकाज अतिरिक्त कार्यभाराने सुरु होते). तसेच दि.३०.३.२००७ पासून “सचिव” पदावर कार्यरत श्रीमती गौरी देशमुख यांनी दि.३०.९.२००९ पासून सचिव पदाचा राजीनामा दिल्याने दि.१.१०.२००९ पासून रिक्त झालेल्या -”सचिव” पदाचे कामकाज अतिरिक्त कार्यभाराने सुरु होते. त्यामुळे सचिव पदाचे सन २००८ व सन २००९ ची तात्पुरती ज्येष्ठतासूची परिशिष्ट - “अ” अन्वये प्रसिध्द करण्यात येत आहे.

२. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक व त्यासोबतची ज्येष्ठतासूची संबंधित अधिकाऱ्यांच्या (सेवानिवृत्त झालेल्या अधिकाऱ्यांसह) निदर्शनास आणावी. तसेच सदर ज्येष्ठतासूचीत काही आक्षेप / त्रुटी असतील तर याबाबत संबंधित अधिकाऱ्यांनी १५ दिवसांच्या आत सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांच्याकडे

निवेदन सादर करण्याच्या सूचना द्याव्यात. त्याचप्रमाणे पंधरा दिवसांच्या कालावधीत प्राप्त झालेल्या अधिकाऱ्यांच्या निवेदनांतील वस्तुस्थिती मंडळाने त्या अधिकाऱ्यांचे सेवापुस्तक व अन्य उपलब्ध अभिलेखावरुन तपासून कार्यालयाच्या अभिप्रायासह या विभागाकडे १५ दिवसांच्या आत कळवावे. विहित कालावधीत आक्षेप / माहिती प्राप्त न झाल्यास ज्येष्ठतासूचीत नमूद केलेला तपशील बरोबर असल्याचे गृहीत धरुन अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिध्द करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०१७०११८११५५००२२३३** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Latika Vivek Patil

Digitally signed by Latika Vivek Patil
Date: 2017.01.30 15:01:40 +05'30'

**(लतिका वि. पाटील)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई
२. संबंधित अधिकारी (महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळामार्फत).
३. निवड नस्ती.

## प्रपत्र - अ

## सचिव, गट-अ या संवर्गाची दि.१.१.२००८ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता सूची

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | नांव | प्रवर्ग (नियुक्तीनंतर प्रवर्ग बदलला असल्यास त्याचा दिनांक) | जन्म तारीख | सचिव पदावरील नियुक्ती दिनांक | नियुक्तीचा मार्ग (सरळसेवेने / पदोन्नतीने) | ज्येष्ठता दिनांक / ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) | (११) |
| १ | १ | श्रीमती गौरी देशमुख | खुला | २४.८.१९६९ | ३०.३.२००७ | म.लो.आ. | ३०.३.२००७ | ३१.८.२०२७ | एम.ए. (इतिहास) | दि.३०.९.२००९ रोजी सचिव पदाचा राजीनामा |

## प्रपत्र – अ

## सचिव, गट-अ या संवर्गाची दि.१.१.२००९ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता सूची

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | नांव | प्रवर्ग (नियुक्तीनंतर प्रवर्ग बदलला असल्यास त्याचा दिनांक) | जन्म तारीख | सचिव पदावरील नियुक्ती दिनांक | नियुक्तीचा मार्ग (सरळसेवेने / पदोन्नतीने) | ज्येष्ठता दिनांक / ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) | (११) |
| १ | १ | श्रीमती गौरी देशमुख | खुला | २४.८.१९६९ | ३०.३.२००७ | म.लो.आ. | ३०.३.२००७ | ३१.८.२०२७ | एम.ए. (इतिहास) | दि.३०.९.२००९ रोजी सचिव पदाचा राजीनामा |